# मुक्तिची रात्र

## बार्बरा मोरो

मराठी: सुशील मेन्सन



# मुक्तिची रात्र

हिवाळ्यात गारठलेल्या एके सकाळी हॅलीला एक धक्कादायक गोष्ट दिसली. तिने पळून आलेल्या दोन गुलाम मुली पाहिल्या.

हे गुलाम - सुसान व मार्गारिट –केटी आणि लेवी कॉफीन यांच्या घरी आसऱ्याला राहिले होते. हे घर *अंडरग्राउंड रेलरोड (भूमिगत रेलमार्ग)* वरचा एक थांबा होता. पळालेल्या गुलामांच्या मागावर असणाऱ्या लोकांनी हॅलीला गुलामांच्या ठावठिकाणाबद्दल विचारले. आता हॅलीला आपल्या कुटुंबियांची सुरक्षा आणि नुकत्याच भेटलेल्या त्या दोन अनोळखी गुलाम मुलींची मदत, यांपैकी एका गोष्टीची निवड करायची होती.

ऐतिहासिक घटनेवर आधारित ही कहाणी आपल्याला मुक्तिच्या वाटेवर पळणाऱ्या गुलामांच्या तसेच त्यांना मदत करणाऱ्या एका तरूण मुलीच्या धैर्याची ओळख करून देते.



1839 साल होते ते. मी केटी आण्टीला - सगळे लोक तिला केटी आण्टीच म्हणत - लोणी द्यायला तिच्या घरी गेले. आण्टी पैसे आणायला आतल्या खोलीत गेली तेव्हा मी तिची मदत करायचं ठरवलं.



"आण्टी, मी लोणी तळघरातल्या किचनमध्ये ठेवून येते," मी पायऱ्या उतरता उतरता बोलले. मी तळघरातल्या टेबलवर लोणी ठेवलं.

अचानक तिथे काही हालचाल झाली. तिथल्या लुकलुकत्या प्रकाशात मी सभोवार नजर फिरवली. मग मी दुसऱ्या खोलीत गेले. मी दोन की तीन पावलंच चालले असेन. माझं हृदय धडधडू लागलं.

अंधारात दोन मुली उभ्या होत्या. आम्ही इतक्या जवळ होतो की आमचे श्वास एकमेकांत मिसळत होते. त्या अजिबात हलल्या नाहीत. आणि मी सुद्धा!

पळून आलेल्या गुलाम!

माझा आणि केटी आण्टी, अंकल कॉफीन यांचा परिचय मागच्याच वर्षी झाला होता. तेव्हा आई-बाबा आम्हाला केंटुकीवरून इंडियानातल्या न्यूपोर्टला घेऊन गेले होते. पण न्यूपोर्टमध्ये मला अलिकडेच कळलं की कॉफीन आण्टी आणि अंकल पळून आलेल्या गुलामांची मदत करतात.



मी पायऱ्यांवरून पुन्हा वर जाऊ लागले.

"काय झालं हॅली? काही बिनसलंय का?" केटी आण्टीने विचारलं. तिने माझ्या हातात पैसे कोंबले.

"काही नाही आण्टी," माझं हृदय जोरजोरात धडधडू लागलं.

तिने माझ्या चेहऱ्याकडे नीट पाहिलं. "तू खूप काळजीत दिसतेयस, बाळा," ती गंमतीत म्हणाली, "नक्की काही नाही ना!"

"खरंच काही नाही," म्हणत मी दरवाजाकडे पळाले. "तू दिलेलं लोणी गोड निघू दे," मागून आण्टीचा आवाज आला.







मी घराकडे पळत सुटले. शहराच्या सीमेवर असलेली पीठाची गिरणी, धान्याच्या रोपांची शेतं, पांढऱ्याशुभ्र बर्फाचे स्फटिक सांडलेली गर्द झाडी मी वेगाने मागे टाकली. त्या मुली या जंगलात लपून राहिल्या असतील का? त्या या शेतांमधून पळाल्या असतील का? त्यांच्यापैकी एक मुलगी तर माझ्याच वयाची दिसली. दुसरीसुद्धा वयाने फार मोठी नसावी. याआधीसुद्धा मी केंटुकीमध्ये भरपूर गुलाम पाहिलेयत. पण पळून आलेले गुलाम मी कधीच पाहिले नव्हते.

मागून मला घोड्यांच्या खुरांचा आवाज ऐकू आला. मग हा आवाज मोठा झाला. घोड्यांवर स्वार झालेली चार माणसं घाईघाईत माझ्याशेजारी येऊन उभी राहिली.

“इथे एखादा घोडा भटकताना पाहिलास का गं पोरी?” एकाने विचारलं. त्याच्या कल्लेदार चेहऱ्यावर सुकलेली थुंकी पसरली होती.

“इथे कुणाला भटकताना पाहिलंस का तू?” दुसऱ्याने विचारलं.

ती माणसं खेकसत बोलत होती .

जाडजूड मान असलेला घोडेस्वार माझ्याकडे पाहून स्मित करत होता. गोड स्मित

मग तो आळसावत म्हणाला, “ए पोरी, आम्हाला तुला काही त्रास द्यायचा नाहीये. हे तुझ्या बाबांसाठी आहे.”

त्याने एक कागद माझ्या पायावर टाकला. त्याचे मोठाले हात चाबकाकडे गेले “हा कागद घरी घेऊन जा. मेहरबानी होईल,” आपली टोपी झुकवत तो म्हणाला.

मी सुसाट धावत सुटले. धान्याच्या गोदामानजिक येताच जोरजोरात ओरडू लागले. बाबा घाईघाईत बाहेर आले. “चार अनोळखी माणसांनी मला हे दिलंय तुमच्यासाठी,” मी धापा टाकत, हातातला कागद हलवत म्हणाले. आम्ही मिळून तो कागद वाचला.





# 600 डॉलरचे बक्षीस

पळपुट्या गुलामांना पकडून देणाऱ्यांना.

सुसान व मार्गारेट या निग्रो मुली 2 जानेवारी रोजी टेनेसीतून पळाल्या आहेत.

मी बाबांकडे पाहिलं. “तुम्ही पळालेल्या गुलामांना मदत कराल? या मुलींचा ठावठिकाणा कळला तर त्या माणसांना सांगाल?”

बाबांनी निरखून बघत माझ्या मनाचा अंदाज घ्यायचा प्रयत्न केला.

मग सावकाशपणे म्हणाले, “मला गुलामगिरी पसंत नाही. पण गुलामांना मदत करणाऱ्यांना शिक्षा करतात. मी मदत केली तर मला 500 डॉलर दंड होऊ शकेल. आपल्या शेतालाही आग लावतील. गुलाम पकडणारे लोक वेगवेगळ्या मार्गांनी गुलामांची मदत करणाऱ्या लोकांना त्रास देतात.”

बाबांनी घराकडे पाहिलं, मग माझ्याकडे. “मला गुलामगिरी आवडत नाही. पण मला संकटही ओढवून घ्यायचं नाही. पळणारे गुलाम स्वत:ची काळजी घेऊ शकतात. आपण मध्ये पडायचं नाही.”

बाबांचे शब्द मी विसरले नाही. आईने मला आजारी शेजाऱ्याला जेवण देऊन यायला सांगितलं. जेवण देऊन घरी परतताना मात्र मी वाट वाकडी केली.



मी लेवी कॉफीन यांच्या दुकानात शिरले तेव्हा मनात एक तीव्र इच्छा उचंबळून आली. काऊंटरमागून मला पाहिल्यावर कॉफीनकाकांनी स्मित केलं.

"हॅलो हॅली! काय मदत करू तुला?"

मी घसा खाकरला. "आज सकाळी गुलाम पकडणारी चार माणसं आमच्या शेतात आली होती. ते पळून गेलेल्या दोन गुलाम मुलींना शोधत होते."

कॉफीनकाकांनी खतावणीच्या वहितून नजर वर करून माझ्याकडे पाहिलं.

"बाबा म्हणतात की पळालेल्या गुलामांना मदत करणाऱ्या लोकांसाठी एक कायदा केलाय. त्या कायद्याने अशा लोकांना शिक्षा होऊ शकते."

हे मी काय करतेय? मध्ये तर पडत नाही ना!

कॉफीनकाकांनी हातातलं पेन खाली ठेवलं.

"हॅली, बाळा, तुला स्वत:ला काय वाटतं या कायद्याबद्दल?"

"माहित नाही.....पण बाबा म्हणतात, कायदा हा कायदा असतो."

तेवढ्यातच, मॅकआर्डल कुटुंब दुकानात आलं. कॉफीनकाका त्वरीत काऊंटरबाहेर आले आणि मला एका कडेला घेऊन गेले. मृदू आवाजात पण ठामपणे ते म्हणाले, "बाबांचं ऐक. तो चांगला माणूस आहे. पण बाळा, तुझ्या अंतरात्म्याला काय वाटतं? एक माणूस म्हणून....." बोलता बोलता ते थांबले. त्यांचे डोळे नरम झाले. "तुझ्या बाबांना माझा नमस्कार सांग. कधीतरी आपण तिघं मिळून या विषयावर बोलू."

खरंतर एव्हाना मी घरी पोहोचायला हवं होतं. पण माझं कुतूहल उतू चाललं होतं. दुकानापासून कॉफीनचं घर जवळच होतं.

केटी आण्टी दारातच भेटली. “मी पळून आलेल्या सुसान आणि मार्गारेटला बघितलंय,” काही विचार न करता मी बोलले.

काही वेळ मला फक्त थरथरत्या पायांखालच्या लाकडी फळीचा करकर आवाज ऐकू येत होता. अखेरीस, केटी आण्टीने दरवाजा उघडला. “ये हॅली, मी तुझी माझ्या पाहुण्यांशी ओळख करून देते.” आम्ही खाली तळघरातल्या किचनमध्ये गेलो. कॅमोमाईल वनस्पतीच्या चहाचा तीव्र सुवास माझ्या नाकात शिरला. त्या दोन मुली टेबलवर बसल्या होत्या. मला पाहिल्यावर त्या बावरल्या.

“सारं काही ठिक आहे,” आण्टी मुलींना म्हणाली आणि मग तिने मला पुढे केलं. “हॅली, तू यांच्यासोबत बस. मी माझं विणकाम घेऊन आलेच.”

“पण.....” मी खोलीत सभोवार तिरपा कटाक्ष टाकला.

“ आत्ता लगेच लपायची गरज नाही,” माझं मन वाचल्यागत केटी म्हणाली. “काही संकट आलं तरच लपायचं,” एवढं बोलून आण्टी वर गेली. आण्टीने सकाळी दिलेल्या खिशातल्या नाण्याशी मी खेळू लागले. अचानक नाणं खाली जमिनीवर पडून घरंगळत गेलं. सुसानने की मार्गारेटने, नक्की माहित नाही कुणी, नाणं आपल्या पायाखाली अडवून धरलं आणि मग वर उचललं.



"ते नाणं माझंय." माझ्या करारी आवाजाने मीच दचकले.

"ते मी कमावलंय. मी लोणी बनवलं आणि आईने ते विकायला परवानगी दिली. आता या पैशातून मी रिबीन विकत घेणार आहे, लाल रंगाची."

त्या दोन मुलींनी एकमेकांकडे पाहिलं. मग त्या माझ्याकडे वळून बघू लागल्या. काय असेल त्यांच्या मनात? हिच्यावर विश्वास ठेवता येईल? ही का आलीय इथे? त्यांनी डोळे माझ्यावर रोखले. मी स्तब्ध उभी होते. मग खुर्ची मागे सरकवून एक मुलगी उभी राहिली.



"मी मुक्त झाले की नोकरी करणार. मग मी खूप पैसे कमावणार," उभी राहिलेली मुलगी म्हणाली.

"त्या पैशातून तू काय विकत घेणार?"

"आई," दिर्घ श्वास घेत ती म्हणाली. "मालकाने तिला विकून टाकलं. आम्ही तिला परत आणणार."

मला खूप वेदना झाल्या. अंगावर चाबूक उगारल्यागत वाटलं. "पण कसं? म्हणजे, आईला परत कसं आणणार?"

"माहीत नाही. आधी आम्हाला मुक्त व्हयचंय," असं म्हणून तिने नाणं देण्यासाठी हात पुढे केला.

"मला नको ते आता. ते तुझं आहे, असं समज."

तरीही तिने आपला हात मागे घेतला नाही.

मग मी सावकाश पुढे होत नाणं घेतलं, "मी तुझ्या आईसाठी काही करू शकत नाही, याचं मला दु:ख होतंय."



अचानक आमच्या वर पावलांची चाहूल लागली. कॉफीन अंकल केटी आण्टीला हाका मारू लागले. घाईघाईत पायऱ्या उतरत ते खाली आले आणि त्यांनी मुलींना लपवलं.

“सरळ घरी जा, बाळा. तुझे बाबा काळजी करत असतील,” ते मला म्हणाले.

मी बाहेर पडले. माझ्यामागे दार जेमतेम बंद झालं, तेवढ्यात चार घोडेस्वार वेगात दौडत आले. रस्त्यावर लोकांची गर्दी जमली. मी त्यांच्यातून वाट काढत पुढे आले. घोडे फुरफुरले, लगामाचे हिसके बसले. घोडेस्वार उडी मारून खाली उतरले आणि कॉफीन अंकलच्या घराचं दार जोरजोरात ठोठावू लागले.



“अरे बंडखोरांनो!” एकजण किंचाळला. “कुठे लपवलंयत मुलींना?” दुसरा ओरडला.

माझ्या आजूबाजूची गर्दी पांगू लागली. लोक धक्काबुक्की करू लागले. घरांची दारं बंद झाली. खिडक्यांवरचे पडदे खाली आले. जाड मानेचा माणूस घरासभोवती फिरून टेहळणी करू लागला. मी लपूनछपून त्याच्या मागेमागे गेले आणि एका झुडपामागे दबा धरून बसले. त्याने खिडकीवर दगड मारला. खिडकीची काच फुटली. व्ऱ्हांड्यात काचा पसरल्या. आणखी एक दगड! दुसरी काच फुटली. पुन्हा एक दगड... मी अचानक उठून उभी राहिले.



"मी मुलींना बघितलंय," माझ्या तोंडून बाहेर आलं.

"हॅली!" कॉफीन अंकलने दार उघडलं आणि मागच्यामागेच घट्ट ओढून घेतलं. "बाळा!" त्यांनी मला सावध केलं.

"मी आज सकाळीच त्या मुलींना विंचेस्टर रोडवरून जाताना पाहिलं. शेत पार करून त्या जंगलात शिरल्या.

तो माणूस माझ्याजवळ आला. "तू त्या मुलींना उत्तर दिशेत जाताना पाहिलं म्हणतेस?"

"हो."

"या कॉफीन अंकलने तुला असं सांगायला सांगितलं?"

मी आवंढा गिळला. "नाही. त्यांनी नाही सांगितलं."

थंडपणे हसून त्याने कॉफीनकडे एक तीव्र कटाक्ष टाकला.

"किती कठीण आहे हा दगड!" त्याने हातातला दगड काचेवर फेकला. काचा फुटून सगळीकडे पसरल्या. "चला घोड्यावर बसा," त्याने आपल्या माणसांना हुकूम सोडला.

मी डोळे घट्ट मिटून घेतले.

"विंचेस्टर रोड म्हणालीस ना?" त्याने माझे खांदे हलवले.

मी हात उचलून बोटाने दिशा दाखवली.

घोडेस्वार निघून गेले. खरोखरच ते गेले. माझे पाय थरथरू लागले आणि मी जमिनीवर कोसळले. कुणीतरी माझ्या डोक्यावर मायेने कुरवाळलं.

“मी मध्ये पडले,” कॉफीन अंकलच्या चेहऱ्याकडे बघत मी म्हणाले.

काही वेळ नीरव शांततेत गेला. मग कॉफीन अंकलने माझी हनुवटी आपल्या हातात धरली, स्मित केलं आणि सावकाश आपल्या घराकडे चालू लागले. “तुझे खूप खूप आभार, बाळा,” जाता जाता ते म्हणाले.

ते अंतरात्म्याच्या आवाजाबद्दल जे बोलले होते त्याचाच मी विचार केला.

बाबा काय बोलले होते, त्याचाही विचार मी केला.

“तू कशाला मध्ये पडलीस?” बाबा मला नाराजीने विचारतील. मी बाबांना नाराज केलं. मला अपराधी वाटू लागलं.

पण बाबाच नेहमी म्हणतात, मी मनाने कणखर आहे. याचा अर्थ, मी स्वत:चं हित समजू शकते, परिणामांना सामोरं जाऊ शकते. मला जे योग्य वाटतं ते मी करते, भले ते इतरांना अयोग्य वाटत असेल. हो, मी अशीच आहे.

मी यापेक्षा जास्त शूर व्हायचा प्रयत्न करेन.

सुसान आणि मार्गारेटसारखं शूर व्हायचंय मला.





मी हात वर उचलले. त्यांना अधिकाधिक उंचावलं. डोकं मागे झुकवलं. सरत असलेल्या दुपारचं आभाळ डोळ्यात साठवलं.

आजची रात्र स्वच्छ आणि नितळ असेल. चांदणी रात्र! सुखाची रात्र! पळण्याची, आशेची, मुक्तीची रात्र!.

समाप्त